आईसक्रीमचा देश (Icecreamcha desh)

कवी : योगेश दत्ताराम नार्वेकर

मु. पो. पूर्णगड, ता. जि. रत्नागिरी

मोबाईल क्र. ९४०४३२९८८८

balnetakshri@gmail.com



# बाप्पा लवकर या

येणार येणार
बाप्पा येणार
आमच्या घरी
लवकर येणार

आमच्याशी बाप्पा
खुप खुप बोलणार
आमच्यासोबत
खेळायला येणार



नैवेद्य मोदकाचा
बाबा दाखवणार
बाप्पा थोडा त्यातला
आम्हालापण देणार

आम्ही त्याच्या चरणी
मस्तक ठेवणार
त्याची करुनी आरती
आशिर्वाद घेणार

गणपती बाप्पा
लवकर घरी या
आम्हाला तुमचं
दर्शन घेऊ द्या

# बाहुलीची घाई

सकाळी सकाळी
उठले मी
बाहुली होऊन
नटले मी

चटकन आईने
नाष्टा दिला
भरभर शाळेचा
फ्रॉक घातला

घडयाळाची होती
चालू टिकटिक
आईची झाली
चालू "निघनिघ"



पमपम गाडीचा
हॉर्न वाजला
आईने पटकन
टिफिन आणला

आईने दप्तर
मागे चढवलं
धावत नेउन
गाडीत बसवलं

गाडीचा धूर
सुटला मोठा
आई करते
दुरून टाटा

# पाऊस आला



भिरभिर भिरभिर
सुटला वारा
ढगांनी काळा
काळोख केला

थेंब अन थेंब
टिपटिप पडती
वर्गात धारेची
लागली गळती

ढमढम ढमढम
ढग ढोल वाजती
डुबकत डुबकत
बेडूक डराव करती

लाल मातीला
गंध सुटला
आला रे आला
पाऊस आला



फुले पाने
डोलात डुलती
आनंदाने मोर
थुईथुई नाचती

# भित्रे ससोबा

एक होते
मोठे कोल्होबा
पाहून त्यांना
हसले ससोबा

ससोबांचा आला
त्यांना मोठा राग
म्हणाले मोडून टाकतो
तुझी एक टांग

ससोबाना फुटला
जोरात घाम
म्हणाले कोल्हेदादा
जरा थांब

चुक झाली
माझी मोठी
तुझ्यापुढे माझी
शक्ती छोटी

पुन्हा नाही
तुला हसणार
कधीच नाही
तुझ्याशी बोलणार



# छकुलीची परी

रात्रीच्या चांदण्यात
आली एक परी
छकुलीला उठवून म्हणे
आले मी तुझ्या घरी

छकुलीला झाला आनंद
लागली ती हसायला
परीने आणला खाऊ
लागली ती नाचायला

झाला खूप उशीर
परी लागली निघायला
परी जाते पाहून
छकुली लागली रडायला

छकुलीला रडताना पाहून
रडू लागली परी
छकुलीला हसवायला
म्हणाली
चल मारू चांदण्यांवर फेरी

# झाडे लावू, पाणी वाचवू

पाऊस आला
पाऊस आला
चला मित्रानो
नाचू चला

चिंब भिजूनी
सारे आपण
शपथ घेऊ
मिळूनी सारेजण

देश सारा आपला
हिरवाईने नटवू
झाडे लावू
झाडे जगवू

पाणी वाहे मोत्यावाणी
त्याला अडवूनी
जमिनीत जिरवू
चला सारे पाणी वाचवू

देशहिताचे कार्य
हातात घेऊ
भारत माझा देश
महान देश बनवू

# आइस्क्रीमचा देश

चला दोस्तांनो आपण
आइस्क्रीमचा देश पाहूया
या थंडगार देशातला
गोड आइस्क्रीम खाऊया



थंडगार चला होऊया
कुठला फ्लेवर्स खाऊया?
थोडं थोडं घेऊन
सारे फ्लेवर्स चाखूया

कधी ऑरेंज, चॉकलेट
कधी पिस्ता, स्ट्रोबेरी
रोज - रोज हे फ्लेवर्स
नेऊया इथून घरी

आइस्क्रीमचा हा देश
आहे खुपच सुंदर
जो सापडणार नाही
शोधूनही या पृथ्वीवर




तुम्हाला तर वाटेल
इथेच कायम राहूया
गोड-गोड देश सोडून
घरी नको जाऊया

पण मला नेहमी
एकच प्रश्न पडतो
हा गोड आइस्क्रीम कोन
तयार कसा होतो?

# वाघोबादादाची फजिती

एकदा वाघोबादादा
निघाले शिकारीला
दोन दिवस झाले
खायला नव्हते तोंडाला

विचार केला पक्का
गावात जाण्याचा
पारुकाकुंच्या कोंबड्या
खाऊन टाकण्याचा



पारूकाकू होती
फारच हुशार
तिच्याकडे होती
काठी तयार

वाघोबादादा घुसले
खुराड्यात
कोंबड्या पाहून
पडले विचारात

हि खाऊ की
ती खाऊ ?
पण लगेच
बाहेर कसा जाऊ ?

पारूकाकू आली
काठी घेऊन
वाघोबादादाला फुटला
घाम काठी पाहून

वाघोबादादा लागले
जोरात घाबरू
पारूकाकू लागली
जोरात मारू

वाघोबादादा धावत
जंगलात पळाले
म्हणाले नको ते गाव
मस्त जंगल आपले

# *झुकझुक गाडी*

झुकझुक झुकझुक
आवाज घुमे
प्रवासी स्टेशनवर
मागून धावे



गाडी भवती
गर्दी दाटली
शिट्टी सुटण्याची
वाजू लागली

भवती झाडीवाडी
मागे धावली
गाव लांब - लांब
सोडू लागली

वेग गाडीचा
वाढू लागला
गार वारा आत
शिरू लागला

झुकझुक गाडी
धावू लागली
धूर आभाळी
सोडू लागली



# कमळ

जीवनच आहे माझे
रोवलेले चिखलात
नाव दिलंय मला
'कमळ' या देशात

कधी पाण्यावर
तरंगत राहते
कधी चिखलात
खुलून दिसते

जाणा-येणाऱ्यांच्या
नजरा वळवते
त्यांना माझ्याकडे
पाहायला लावते



वेगवेगळ्या रंगात
रुपात मी फुलते
वाऱ्याच्या लहरीत
खूप खूप डोलते

चिखलातून तोडून
लोक मला नेतात
फुलदाणीत ठेवून
घर सजवतात

राष्ट्रीय फुलाचा दर्जा
हाच माझा सन्मान
चिखलात फुलले तरी
मीच आहे नशीबवान

# उंदराची पळापळ

एकदा उंदीर
घेत होता झोका
दुरून होता
पहात बोका

बोका लागला
मस्त जीभ चाटू
बोका आहे शांत
उंदराला लागे वाटू

बोक्याने मारली
झुल्यावर उडी
झुल्याची झाली
तुटून गडगडी



झुला तुटला
उंदीर पडला
बोका उंदराला
शोधत बसला

उंदीर जोरात
धावू लागला
पटकन जाऊन
बिळात शिरला

म्हणाला, 'विश्वास
नाही बोक्यावर
खतराच असतो
त्याचा उंदरांवर'

## श्रावणात चाले खेळ आमचा

चला आपण सारे
श्रावणात झिम्मा खेळू
आनंदाने निसर्गाचे
हिरवे रंग उडवू

फुला-पानांसोबत
वारयासंगे डोलू
उन पावसाचा खेळ
डोळे भरून पाहू

रिमझिम पावसात
चिंब होऊनी भिजू
पक्ष्यांच्या सुरांसोबत
आपणही गीत गाऊ

वेलींचा झोपाळा करून
त्यासंगे झोका घेऊ
इंद्रधनुच्या रेषेवरून
आभाळ सारे पाहू

सात रंगात सारे
मिसळून जाऊ
आनंदाने श्रावाणचे
मनी रंग भरू

# सूर्याला विनंती



सूर्य डोक्यावर
येऊन ठेपला
अंगाची कायली
करू लागला

घामाच्या धारा
लागल्या सुटू
खेळ आमचा
लागला तुटू

आईने घातली
बाहेर जाणे बंदी
राहवत नाही घरी
आम्ही खेळाचे छंदी

सूर्यदेवा तुला
करतो विनंती
थांबव उन्हाची
वाढणारी गती

खेळ आमचा
खेळू दे ना
तुझ्या देशात तू
एकटा खेळ ना

विनंती ऐकून
सूर्य झाला पसार
सावली येऊन
आम्ही झालो तयार

# सुंदर परी

एक होती सुंदर
पांढरी पांढरी परी
दिसायला सगळ्यात
खूप खूप भारी

डोळे तिचे होते
सुंदर निळे निळे
सुंदर डोळे पाहुनी
सारे तिच्यावर जळे

रंग तिचा आहे
छान गोरा पान
स्वप्नांच्या दुनियेत
तिचा पहिला मान



कापसासारखे दोन पंख
शोभे तिच्या पाठीवरी
उडताना सुंदर दिसे
पांढरी पांढरी परी

हातात असे तिच्या
छोटी जादूची काटी
फिरवूनी हवेत ती
साऱ्यांना खाऊ वाटी

# संगणकाची दुनिया

संगणकाची
दुनिया न्यारी
वाटे आम्हा
प्यारी प्यारी

गेम खेळण्यात
वाटते मज्जा
लाईट गेल्यावर
उडतो फज्जा

चाटिंग करताना
भेटतात मित्र
ऑफलाईन झालं
कि बदलत चित्र

गाणी ऐकताना
वाटते खूप मस्त
आईची चालू असते
आमच्यावर गस्त

टिकटिक कीबोर्ड
लिहितो पान
आवाज एकून
आई धरते कान

दाखवी माहिती
भरपूर इंटरनेट
इथेच होती साऱ्या
संगणकांची भेट



# रडवी चांदणी

एक पांढरी चांदणी
आभाळात बसली
नाचताना पाहून
मला खूप हसली

म्हणाली, नाचतो
वेडा बघा कसा ?
पायाचा ठेका याला
जमत नाही तसा

एक पांढरा ससा
उतरला जमिनीवरी
म्हणाला, शिकवतो
तुला मी नाच भारी

शिकवला मला त्याने
खूपच सुंदर नाच
पाहताना चांदणीच्या
भरली ढगांची काच

चांदणीच्या आलं
भळाभळा रक्त
म्हणाली ती मला
खूप रे आहे दुखतं

जखमेवर औषध
पाठवलं मी तिला
आनंदाने गोड टाटा
केला तिने मला

# पुस्तक माझा मित्र

ज्ञानाच्या विश्वात
कायम सोबत राहतो
ज्ञान देऊनी पुस्तक
माझा मित्र होतो



त्याच्यामुळे मला
सारे सोपे वाटते
तो नसेल सोबत
तर कसेतरी होते

छान - छान गोष्टी
वाचायला देतो मला
रंगीत चित्रांमधून
फिरायला नेतो मला

कविता खुपच सुंदर
असतात त्याच्यात
कथा बोधपर असतात
त्याच्या पुस्तकी जगात

प्रश्न कितीही कठीण
तरी उत्तर देतो सोपे
कधीही चिंता नसते
म्हणून मी शांत झोपे

चिंता नसते मला
पुस्तक असतो सोबती
तोच देतो मला
खुप सारी माहिती

# माझी शाळा

कोकणात आमच्या
माझी शाळा मोठी
चहुबाजूनी तीच्या
हिरव्या वाटा दूर नेती

मोठी आंब्याची झाडे
तिच्या उभी मागे
पिवळे धम्मक आंबे
खायला गोड लागे

प्रार्थनेचा सूर आमचा
घुमतो साऱ्या गावात
सरस्वती देवी आमच्या
वसलीय मना-मनात



गुरुजन आमचे सारे
शिकवतात खुप छान
आम्ही मुले करतो
त्यांचा आदर सन्मान

सायंकाळी जमून सारे
गातो ' वंदे मातरम '
भारतमातेच्या चरणी
करतो आम्ही प्रणाम

झुळझुळ वाहे नदी
शाळेच्या समोरून
शाळा सुटता पळतो
आम्ही पुलावरून

# कोल्ह्याला घडली अद्दल

खारूताई आणि चिऊताईची
होती चांगली मैत्री
त्यात आला लबाड कोल्हा
होता मोठा खत्री

येता-जाता कोल्हा
दोघांची वाट आडवी
हसुनी दोघांवर तो
मोठमोठ्याने चिडवी



चिऊताईला आला राग
खारूताई तीला करे शांत
अद्दल घडवू कोल्ह्याला
विचार करू लागले निवांत

दिवस उगवला
बदला घेण्याचा
कोल्ह्याला चांगली
अद्दल घडवण्याचा

एका मोठ्या विहिरीत
होते पाणी भरपूर
त्यात होते मासे
पाहत होता कोल्हा चतुर

समोर आली खारूताई
लागली त्याला चिडवू
मागून आली चिऊताई
नाकाला नखं लागली लावू

कोल्ह्याला आला राग
धरायला त्यांना आला
धरता-धरता तोल जाऊनी
डुबकन विहिरीत पडला

# पाऊस आमचा दोस्त

पाऊस आला
पाऊस आला
आम्हाला चिंब
भिजवू लागला

मुसळत्या सऱ्यांसंगे
टोचू लागला
जोराच्या वाऱ्याने
झुलवू लागला

पाऊस आमचा
झाला दोस्त

त्याच्यासंगे खेळायला
आम्हाला वाटते मस्त

आमच्याशी कधी
तो रुसत नाही
खेळताना कधी
तो चिडत नाही

पाऊस देतो
आम्हाला आनंद
होतो त्याच्यासंगे
खेळण्यात धुंद

# मी रुसून बसले

एवढे मी काय केले?
थोडेसे कागद फाडले
भरलेल्या पाण्यात दगड टाकले
म्हणून मम्मीने मला मारले
मी लगेच रुसून बसले

एवढे मी काय केले?
आवरलेले सारे विस्कटून टाकले
पप्पाच्या शर्टाला मातीचे डाग लावले
म्हणून मम्मीने मला मारले
मी लगेच रुसून बसले

एवढे मी काय केले?
जेवायला मला नको सांगितले
अजून मला खेळायचे म्हटले
म्हणून मम्मीने मला मारले
मी लगेच रुसून बसले

मी रूसलेली पाहून
मम्मी - पप्पा गुपचूप आले
माझ्या गुदगुल्या करून
माझ्यासोबत खेळू लागले
मी जोरजोरात हसू लागले...

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठानने लहान मुलांसाठी ई साहित्य बनवण्याचा आपला कार्यक्रम धडाक्याने सुरू ठेवला आहे. लहान मुलं हीच भविष्य. मराठी भाषा कितपत वाढणार व वापरली जाणार ते आताची लहान मुलंच ठरवणार नाही का? आणि भाषांचं भविष्य ठरणार आहे मोबाईल आणि कॉम्प्युटर, आयपॅड, टॅब्लेट वरून. आताच्या मुलांना इंटरनेट आणि ई बुक्स हेच आयुष्य असणार आहे. त्यांना मराठीत ई बुक्स वाचण्याची सवय आतापासूनच लावायला हवी. पण त्यांना ती आवडतील का? वाचतील का ती? तर हो ! कशावरून? तर अनुभवावरून सांगतो.

या वर्षी सासवड येथे साहित्य संमेलन झाले. त्यात ई साहित्य प्रतिष्ठानने ई पुस्तकांची माहिती देणारा स्टॉल ठेवला होता. त्यावर मोबाईल टु मोबाईल ब्ल्यु टुथ ने पुस्तकं ट्रांस्फ़र केली. आणि लहान मुलांसाठी एक साठ पुस्तकांची सुंदर सिडी सुद्धा ठेवली होती. तीन दिवसांचा कार्यक्रम होता. म्हणून भरपुर साठा नेला. पण लहान मुलांच्या ई पुस्तकांची सीडी पहिल्याच दिवशी आउट ऑफ़ स्टॉक झाली. नंतरचे दिवस या स्टॉलवर हिरमुसल्या चेहऱ्याने शेकडो मुले भेट देऊन गेली. शेकडो नव्हे नव्हे हजारो. ज्यांना मराठी भाषेच्या भवितव्याची चिंता वगैरे असेल त्यांनी कृपया पुन्हा पुन्हा वाचावे. लहान मुलांना ई पुस्तकं अतिशय आवडतात.

म्हणून ई साहित्यने खास बालविभाग सुरू केला आणि नाशिकच्या अनघा हिरेंच्या सबल मार्गदर्शनाखाली तो उत्तम चालला आहे.

तुमच्या मुलांना हे दाखवा. वाढू द्यात. मुलांना आणि ई साहित्याला.

आपले नम्र

टीम ई साहित्य